नवनाथ भक्तिसार    अध्याय विसावा

श्रीगुरु गोरक्षनाथ आपल्या गुरूंच्या शोधासाठी व्याकूळ झाले होते. अथकपणे मजल दरमजल करीत गोरक्ष गौडबंगाल पार करून स्त्री राज्याच्या सीमेनजीक आले. अंमळ विसावा घेत असतांना त्यांना कलावंतीणीचा मेळावा दिसला. विचारपूस केल्यावर कळले की ते स्त्री राज्यातील महाराणीचे गायन, वादन, नर्तनाद्वारे मनोरंजन करण्यासाठी निघाले आहेत. मुख्य नर्तकीला त्यांनी विनंती केली की मला ही तुमच्या ताफ्यात शामिल करा. कारण आत प्रवेश कसा करावा ह्या प्रश्नाने गोरक्षनाथ त्रस्त झाले होते. त्यांना माहित होते की पुरुषांना प्रवेश बंदीच नाही तर त्यांचा मृत्युच अटळ असतो. पण मुख्य नर्तकी कलिंगाच्या माध्यमातून हा प्रश्न सोडवला गेला. त्यसाठी गोरक्षनाथांना स्वतःला सिद्ध करण्यासाठी आपले कलागुण कौशल्य सादर करावे लागले. दरम्यानच्या काळात मारुतीराया काही ना काही व्यत्यय आणणार याची जाणीव असल्याने, स्त्री राज्याच्या सीमेवर वज्रास्त्र, स्पर्शास्त्र, मोहोनास्त्र आणि नागास्त्र या संहारक अस्त्रांची पेरणी गोरक्षनाथांनी केली. नित्यनियमांप्रमाणे रामेश्वर सेतुहून उड्डाण करीत मध्यरात्री हनमंत स्त्री राज्यात भुभुःकार करण्यासाठी आला आणि सीमा ओलांडताना त्या बलाढ्य अस्त्रांमुळे जायबंदी झाला!. त्याला संकटमुक्त करण्यासाठी प्रभू रामचंद्रांना भूलोकी यावे लागले. गोरक्षाने स्त्री राज्यातून मच्छिंद्रनाथांना अन्यत्र कुठेही नेऊ नये असे मारुतीरायला वाटत होते कारण त्यांनी स्त्री राज्याच्या महाराणीला, मैनाकिनीला तसे वचन दिले होते. त्यांनी प्रभू रामचंद्रांना मध्यस्थ करून गोरक्षाचे मतपरिवर्तीत करण्याचे निष्फळ प्रयत्न केले. श्रीरामाने हनुमंताला दिलासा दिला की तू आधीच तिच्या वचनातून मुक्त झाला आहेस. इतऊपर तिच्या प्रारब्धात असेल तसेच होईल, व्यर्थ चिंता करू नकोस असा सल्ला दिला आणि गोरक्षनाथांस शुभाशीर्वाद देऊन श्रीराम आणि श्री हनुमंत स्वस्थानी परतले.

पुढे, स्त्री देशाची राजनगरी शृंगमुरुडमध्ये, पहाटेच्या सुमारास मखमली मंचकावर, साखर झोपेत राणी मैनाकिनी पहुडली आहे. साखर झोपेतली प्रसन्नता चेहऱ्यावर विलसित आहे. अशा वेळी हनुमंताने सूक्ष्म रूप धारण करून तिच्या महालात प्रवेश केला. कुणाचीही चाहूल नाही अशा निरव एकांतात तिला जागे करीत म्हणाले, “ए, किलोत्त्ला! अगं पद्मिनी उठ! जागी हो.”

प्रस्तुत ग्रंथात स्त्री राज्याची महाराणी मैनाकिनीचा उल्लेख अनेक वेळा आला आहे पण ‘किलोत्त्ला’ आणि ‘पद्मिनी’ या विशेष नावांचा हनुमंताकडून उल्लेख झाला याची पार्श्वभूमी ही अशी आहे...स्वर्गातील सिंहलद्वीप निवासी सर्व स्त्रियांची प्रमुख मैनाकिनी होती. सौंदर्यवती; पद्मिनी मैनाकिनी, प्रातःसमयी स्नानानंतर महालाच्या सज्जावर सूर्यकिरणात केस झटकून सुकविण्याचा प्रयत्न करीत होती. प्रसन्न मुद्रेने आकाशाकडे पाहत असताना तिला एक विपरीत दृश्य दिसले. उपरिच्चर वसू विमानातून आकाशमार्गे जात होते. ऐसपैसपणे बसल्याने त्यांनी नेसलेले वस्त्र एका बाजूस सरकून लिंग उघडे पडल्याचे त्यांच्या लक्षात आले नाही. विमानाच्या गवाक्षातून हे दृश्य दिसत होते. ते पाहून मैनाकिनी खदखदा हसू लागली आणि ते उपरिचरांनी पहिले, ही आपली फजिती पाहून आपल्यावर हसत आहे ह्यामुळे ते रागावले आणि त्यांनी शाप दिला. “दुष्ट पापीणी, पर पुरुषाला पाहून काम भावनेने हसलीस, म्हणून तुझी पवित्रता भंग पावली आहे. अगं! मी सर्व वसुंमध्ये ज्येष्ठ, श्रेष्ठ, तपी, इंद्रियदमनी असून माझ्याकडे विकृत भावनेने पाहून हसतेस म्हणून मी तुला शाप देत आहे, “भूलोकातील अशा ठिकाणी, ज्याठिकाणी तुला पुरुष दृष्टीस पडणार नाही अशा स्त्री राज्यात जाऊन पडशील.” उपरिचराने आपणास स्वर्गातून पदच्युत होण्याचा शाप दिल्याचे ऐकून, तिने त्यांची स्तुती आरंभली,

“महाराज वसुनाथ! अपराध झाला. खेदपूर्वक क्षमा मागत आहे. आपला शाप खोटा होणार नाही हे निश्चित! माझे प्रारब्धभोग म्हणून तो भोगेनच परंतु आता दयाळूपणे उःशाप देऊन सुटकेचा मार्ग सांगण्याची कृपा करावी, आपण शांतीसागर, योगदमनी आणि कनवाळू म्हणून विख्यात आहात, माझ्यावर दया करा आणि उःशाप द्या.” त्यावर दया उत्पन्न होऊन वसु म्हणाले, “स्त्री राज्याची स्वामिनी किलोत्त्लाचे आयुर्मान संपत आले आहे. त्या सिंहासनाची तू स्वामिनी होशील. धरणीवर माझा पुत्र ‘मच्छिंद्रनाथ’ या नावाने अवतार घेईल आणि तुझ्याशी देहसंग करील. त्याच्यापासून तुला मीननाथ नावाचा पुत्र होईल. त्यानंतर तुम्ही एकमेकांपासून विभक्त होऊन, तू परत सिंहलद्वीपात येऊन पूर्व पद प्राप्त करशील.”

यावर तिने विचारले, “स्त्री देशात पुरुषाचे दर्शन सुद्धा होत नसल्याने, खरं तर तिथे पुरुष जात नसल्याने, तेथील स्त्रियांची कामशांती आणि संत्सनप्राप्ती कशी होते?” मग वसुंनी तिला मारुतीच्या भुभुःकाराचा कथाभाग ऐकविला. तिने पुन्हा विचारले, “महाराज! आपण सांगितले की मारुतीच्या भुभुःकाराने पुरुष मृत्यू पावतात, तर मग आपला पुत्र मच्छिंद्रनाथ तेथे कसा येऊ शकेल?”

तू किलोत्त्लेच्या सिंहासनावर विराजमान झाल्यावर, मारुतीसाठी तपश्चर्या करून त्याला प्रसन्न करून घे. त्याच्याकडे तू शरीरसंबंध करण्याची मागणी कर. तसे केल्याने मारुती संकटात पडून तुला मच्छिंद्राची प्राप्ती करून देईल आणि मच्छिंद्रसुद्धा भयमुक्त होऊन स्त्री राज्यात वास करील.”

“पण मारुतीने स्वतःच माझ्या मागणीचा स्वीकार करून शरीरसंबंध करावयास तयार झाला तर काय करावे? मग मच्छिंद्रनाथांची भेट कशी होईल?

“ते सर्वस्वी असंभव आहे, मारुती हा ब्रह्मचारी आहे. विषयवासनारहित असल्याने तो कदापि स्त्रीसंग करणार नाही. तुझ्याशी रत होण्यासाठी तो मच्छिंद्रालाच घेऊन येईल, हे पक्के ध्यानात ठेव.” असे सांगून उपरिचर वसु निघून गेले.

शापवाणी प्रमाणे मैनाकिनी शृंगमुरुड नगरीत अवतीर्ण झाली. सहज भटकंतीत ती एका चार्मकार स्त्रीच्या घरी गेली. थकून ओसरीवर बसली होती तेव्हा त्या स्त्रीने विचारले, “अगं सुस्वरूप महिले! तू कोण आणि कुठून आलीस?

“माई! मी सिंहलद्विपावरची आहे परंतु उपरिचर वसुंच्या शापामुळे मी स्थानभ्रष्ट झाले आहे. आता मी कुठे राहू? कुठे जाऊ? कोण माझे सांगोपन करील? काही कळत नाही.” तिच्या नम्रतेने आणि सुशील व्यक्तिमत्वाने भारावलेली ती स्त्री म्हणाली, “अगं! काळजी करु नकोस. माझ्या घरी तू निसंकोचपणे राहा, माझ्या घरात दुसरे कोणीच राहत नाही. मी पण एकटीच असते स्वतःच करायचे आणि खायचे! माझी पण तारांबळच असते. तू माझ्याकडे राहा, मुलीप्रमाणे सांभाळ करीन मी तुझा.” त्या मायाळू स्त्रीचे निर्मळ मन पाहून मैनाकिनी तिच्या घरी मुलीसारखी राहू लागली. झाडलोट, धुणेभांडी, स्वयंपाक पाणी करून स्वतः खाऊ लागली आणि धर्माच्या मातेलाही भरवू लागली अशा प्रकारे कालचक्र पुढे सरत होते.

एके दिवशी, राज्याची स्वामिनी किलोत्त्ला, प्रधान मंत्र्याला पाचारण करून म्हणाली, “प्रधानजी आता आमचे वय झाले असून वृद्धत्वामुळे देह गलीत गात्र झाला आहे. राज्यकारभाराची धुरा तरुण रक्ताकडे सोपविणे कर्मप्राप्त आहे पण कोणाची निवड करावी ते काही सुचत नाही. आपला काय मनोदय आहे.” प्रधानमंत्री म्हणाले, “महाराणी जी! हत्तीच्या

सोंडेमध्ये फुलांची माळ घालून हत्तीला नगरामध्ये फिरवावा. ज्या भाग्यशाली कामिनीच्या गळयांत हत्ती माळ घालेल, तिचा राजगादीवर स्वामिनी म्हणून राज्याभिषेक करावा. प्रधानजींच्या योजनेनुसार महाराणी किलोत्त्लाने शुभदिन, शुभतिथी पाहून सर्व स्त्रियांची महासभा भरवली आणि हत्तीच्या सोंडेत फुलमाळा घालून फेरीस आरंभ केला. उपस्थित सर्व स्त्रियांच्या सभेतून हत्तीने नेमके मैनाकिनीला शोधून तिच्या गळयात माळ अर्पण केली. पूर्व सुकृताचे फलस्वरूप स्वामिनीपद प्राप्त झाले. राजवैभवाच्या प्राप्तीनंतर महाराणी मैनिकिनीने तपश्चर्या करून हनुमंताला प्रसन्न करून घेतले.

ग्रंथकर्त्याचे तपशिलात जाऊन सांगावयाचे प्रयोजन म्हणजे मारुतीरायाने 'किलोत्त्ला' व 'पद्मिनी' अशी नावे पुकारत मैनाकिनीला गाढ झोपेतून जागे केले. 'मैनाकिनी' हे आई वडिलांनी आवडीने ठेवलेले नाव. सिंहलद्वीपमधील रूपवती म्हणून सर्वत्र व्यवहारात 'पद्मिनी' नाव प्रचलित होते आणि स्त्री राज्यात किलोत्त्लाचे सिंहासन प्राप्त झाले म्हणून 'किलोत्त्ला' अशा नावाने हनुमंताने संबोधले.

हनुमंताने मैनाकिनीला जागे केले, ती जागी होऊन उठून बसली, समोर हनुमंताला पाहून भक्तीभावाने नमस्कार केला. हनुमंत सूक्ष्म रुपात आणि एवढ्या प्रातःसमयी आपल्याला काही म्हत्वाचे सांगण्यासाठीच आला आहे हे मैनाकिनीने जाणले. हनुमंत म्हणाला, "तुला दिलेल्या वचनाप्रमाणे, मी एवढे दिवस मच्छिंद्राला तुझ्या स्वाधीन केले. आता तुम्हाला पुत्र प्राप्ती ही झाली आहे. मी तुझ्या वचनातून मुक्त झालो आहे परंतु तुझ्या सुखात विघ्न येणार आहे. मच्छिंद्राचा शिष्य गोरक्ष येथे येत असून तो महाप्रतापी, सामर्थ्यशाली आणि अजिंक्य आहे. तुझ्यासाठी मी साक्षात श्रीप्रभू रामचंद्रांना मध्यस्थी केले, तरीही तो ऐकण्याच्या मनस्थितीत नाही. मच्छिंद्रनाथांना घेऊनच जाणार हा त्याचा हेका कायम आहे. आता तो आलाच तर त्याला वश करून त्याच्या निश्चयात बाधा आण. तो विरक्त तपस्वी असल्याने सहजासहजी वश होणार नाही परंतु मधुर भाषण, द्रव्याचा मोह, आसन गौरव, वस्त्रालंकार गौरव, भोजनआदी नाना प्रकारच्या गौरावाने, वैभवाने त्याला वश करून घ्यावा. अग्नी जतन करण्यासाठी राखेला किंवा सोने जतन करण्यासाठी चिंधीला सांभाळावे लागते त्याप्रामाने मच्छिंद्राला जपण्यासाठी त्याची सेवा करणे भाग आहे. आता येथून पुढील कार्य तू एकटीने करावयाचे आहेस." असा सावधानतेचा इशारा करून स्वतःचीही सुटका करून घेतली आणि निघून गेला.

गोराक्षनाथांचे स्त्री राज्यातील प्रवेशाचे मार्ग सोपे होत गेले. कलिंगेच्या कलापथकसोबत वाटचाल करीत ते राजनगरीत येऊन पोहोचले. मुक्कामासाठी एका धर्मशाळेत उतरले. मुख्यनायिका कलिंगेने राजवाड्याच्या द्वारपालांकरवी कलापथक आले असल्याचा निरोप महाराणीकडे पाठविला. भेटीची आज्ञा मिळताच, ती पाच सात सहकलावंतीणींना घेऊन सभास्थानी गेली. सुवर्णसिंहासनावर महराज मच्छिंद्र आणि समीप महाराणी मैनाकिनी विराजमान होते. ते दृश्य म्हणजे तारकांच्या मेळयातील चंद्र किंवा सुवर्णकोंदणातील हिरा, त्याप्रमाणे त्या कामिनींच्या मेळाव्यात मच्छिंद्रनाथ शोभत होते. खरं तर त्या कामिनी नव्हे तर सूर्याभोवती पिंगा घालणाऱ्या किरणशलाकाच भासत होत्या. राजाराणीला मुजरा करून कलिंगा म्हणाली, "हे महाराजा शेल्यापती! देशोदेशात पसरलेली आपली कीर्ती ऐकून आम्ही दूर देशातील कलाकार येथे आलो आहोत. जसा हस्तीनापुर सम्राट बृहद्रथ, गौडबंगालचा स्वामी राजा गोपीचंद त्याप्रमाणे 'स्त्री देशाची स्वामिनी किलोत्त्ला कीर्तिमान आहे.' ही ख्याती ऐकूनच आम्ही आमचे कलागुण दाखविण्यासाठी आलो आहोत. तरी त्याची संधी मिळावी ही प्रार्थना आहे." महाराणी किलोत्त्लाने प्रसन्न होऊन रात्री नृत्यमहालात येण्याची आज्ञा दिली.

रंगमहालात कलावंतांच्या कलाविष्कार पाहण्यासाठी मनोरंजन प्रेमींची उपस्थिती आहे. महाराणी मैनाकिनी सभास्थानी महाराजांसह स्थानापन्न झाली आहे. सभा मंडपाची देखणी सजावट करण्यात आली आहे. दीपमाला प्रज्वलित करण्यात आल्या आहेत. पारदर्शक स्फटीकाच्या कुपींत मेणबत्त्या तेवत आहेत. सुगंधी अगरबत्त्या पेटवून कनोजी अत्तराचा शिडकावा केला जात आहे. सुवासिक वातावरणात त्रयोदशगुणी विड्यांचे तबक फिरवले जात आहे.

नृत्यगायन करण्यासाठी कलिंगा सोबत गोरक्षनाथ निघाले आहेत. ते तिच्या कानात म्हणाले, “बाईजी! तुम्ही नृत्यगायन कराल तेव्हा माझ्याकडे मृदुंग वाजविण्यास द्यावा. मी सर्वोत्कृष्ट वादन करून सर्वांना प्रसन्न करून घेईन. मग तुम्ही तुमचे कसब वापरून पाहिजे तेवढी बिदागी मिळवा. कलिंगा म्हणाली, “पुर्वंडस्वामी, तेथे सर्व स्त्रिया आहेत हो. तुम्हाला तेथे कसे नेता येईल? स्त्री राज्यात पुरुष आला म्हणून एकच गदारोळ होईल. रंगाचा बेरंग होईल.” गोरक्ष म्हणाले, “अहो बाईजी! मी स्त्री वेष परिधान करून येतो. काळजी करू नका, माझी ही इच्छा पूर्ण होईल आणि तुम्हाला घसघशीत बिदागी मिळेल.”

“ठीक आहे, करा स्त्री वेष परिधान.” गोरक्षनाथांनी दाढीमिशा सफाचट करून चेहरा मुलायम केला, साडी चोळी परिधान केली. जटा सोडून सुंदर फुग्यांचा शोभीवंत भांग पाडला, केसात मोत्यांचे सर आणि सुंदर फुलांचा गजरा माळला. भांगात शेंदूर भरून कपाळावर ठसठशीत कुंकुम लावले. डोळ्यांत सुरमा भरला, डोक्यावरून पदर घेऊन बेंबीजवळ खोचला, कानात कर्ण भूषणे घातली. नाकात खऱ्या मोत्यांची नथ, गळयांत सोन्याच्या माळा, हातात बांगड्या! किती वर्णन करावे. साज शृंगार करून गोरक्षनाथ गिरकी घेऊन कलिंगासमोर उभे ठाकले. ती डोळे फाडफाडून आश्चर्याने बघत राहिली. मुळातच देखणे रूप असलेला पुर्वंड स्वामी, स्त्री वेशात अप्सरेप्रमाणे भासत होता. तिने तर त्याच्या नावाचा; पुंखडा असे स्त्रीवाचक नामकरण देखील केले. मदनकन्या पुंखडा हातात मृदुंग घेऊन ठुमकत ठुमकत चालू लागली. सभेतील सर्व स्त्रिया तिला एकटक पहात राहिल्या, मुख्य नायिका कालींगेपेक्षाही पुंखडा सुंदर दिसत होती. नृत्यगायनाचा आस्वाद घेण्यासाठी खचाखच भरलेल्या सभागृहेत कालींगेच्या पथकाने सिंहासनासमोर जाऊन महाराज महाराणीला त्रिवार मुजरा केला. सुवर्णसिंहासनावर आसनस्थ मच्छिंद्रनाथ चिंतामणीसारखे तेजस्वी दिसत आहेत. गोरक्षाने अर्थात स्त्री वेशातल्या पुखंडेने आपल्या गुरूंचे डोळे भरून दर्शन घेतले. पुन्हा पुन्हा भक्तीभावाने मुजरा केला, मनात म्हणाले, “वंदन गुरुदेवा! कित्येक युगायुगानंतर दर्शन झाल्यासारखे वाटत आहे. आपल्या दर्शनासाठी प्राण कासावीस झाले होते. आता जीव शांत झाला. श्रीगुरूचरण दर्शनाने आज धन्य झालो, कृतार्थ झालो.

कलिंगा सहकाऱ्यांसह नृत्य गयानासाठी सज्ज झाली. वाद्ये छेडली गेली. संगीत लहरींनी एक नादमय वातावरण निर्माण झाले. गुरुदर्शनाने उत्साहित झालेल्या पुखंडाने नृत्याविष्कारासाठी उभ्या राहिलेल्या नृत्यांगनेसाठी मृदुंगावर थाप मारली आणि त्या तालावर नृत्यांगना कुशलतेने पदन्यास करू लागली. घुंगरूंचा लयबद्ध छनछनाट आणि मृदुंगामधून निघालेले, “ना धिन ना ना तिरकीट धा तिरकीट धा’ हे ध्वनी यांची जुगलबंदी रंगात आली. वादकांच्या कौशल्याने आणि नर्तकीच्या अदाकारीने उपस्थित रसिकजनांचे देहभान हरपले. सर्व सभा तल्लीन झाली. गायन वादन या कलांची आराध्य देवता सरस्वतीही तो अवर्णनीय नाद ताल श्रवण करून संतुष्ट झाली असती. “वाहव्वा! फारच छान!!” असं म्हणत महाराजांनी आपल्या गळयातील कंठा पारितोषिक म्हणून नर्तकी कलिंगाच्या पुढ्यात फेकला. असा अलौकिक वादनकार साजिंदा साथ करीत असल्याने कलिंगा देहभान हरपून होऊन नृत्य करीत आहे. गायनात मुखडा आणि अंतरा

यांत रंगत यावी म्हणून वाद्यांची धून क्षणभरासाठी संथ आणि हळुवार होत जाते, त्या क्षणाला अकस्मात समेवर जाताना “चलो ss मच्छिंदर गोरख आया ss” हे ध्वनी स्पष्टपणे मृदुंगात उमटले. ही किमया गोरक्षाने मृदुंगावर आपली बोटे नाचवीत इतक्या सफाईदारपणे केली की महाराज मच्छिंद्रनाथांना अस्वस्थ वाटू लागले. त्यांचे रुदय धडधडू लागले. महारजांची अस्वथता त्यांच्या देहबोलीतून गोरक्षांना जाणवू लागली, बाण वर्मावर बसला आहे हे त्यांनी हेरले. पुन्हा पुन्हा ‘चलो मच्छिंदर गोरक्ष आया’ ही ध्वनी मृदुंगवादनाच्या माध्यमातून उमटवली. हा भास तर नाही ना? जसजशी ह्या चार शब्दांची पुनरावृत्ती होई तेव्हा तेव्हा महाराजांचे दचकून मुख म्लान होई, काय चमत्कार आहे हा? मैफिलीतले चित्त उडाले. त्यांची खिन्नता आणि चिंतायुक्त चर्या पाहून महाराणीने विचारले, “नाथ! आपण उदास का झाला आहात?” “प्रिये किलोत्तमा! काही तरी विपरीत होत आहे, येथे गोरक्ष आल्याचा भास होतो आहे. त्याच्या भीतीची टांगती तलवार माझ्या माथ्यावर आहे. तो महान तपस्वी तर आहेच पण महापराक्रमी असा भक्तचुडामणी आहे. तो जर येथे आला तर मला घेऊन जाणार हे निश्चित. मग तुझा सुखाचा नाश होणार.”

हे ऐकून किलोत्त्लेला मारुतीच्या इशाऱ्याचे स्मरण झाले. तिचेही मैफिलीतून चित्त विचलित झाले. मृदुंगवाद्यातील तो शब्द ध्वनी आता तिलाही ऐकू आला. तिने कालींगेला बोलावून आज्ञा केली. “नर्तकी, तुझ्याकडील सर्व साज उत्कृष्ठ आहेत पण आता तू आमची वाद्ये वाजवून दाखव पाहू!” कलिंग म्हणाली, “जशी आपली आज्ञा!” मग तिने महाराणीने दिलेली वाद्ये आपल्या कलाकारांकडे सोपवली. महाराणी मैनाकिनीने आपली एक एक सेविका तिच्या ताफ्यातील वादकांच्या मागे गुप्तपणे उभ्या केल्या. पुन्हा मैफिल सुरु झाली. पुखंडाने अर्थात गोरक्षाने पूर्वीप्रमाणेच त्या मृदुंगातून ते विशिष्ट बोल उमटविले. पुखंडेच्या मागे उभ्या असलेल्या सेविकेने महाराणीला, मृदुंगामधून शब्दध्वनी उमटल्याचे इशाऱ्याने सुचविले. महाराणीने आपल्या सेवेतल्या कुशल मृदुंग वाद्काकडून वाजवून पहिले. तव्हा हे शब्दध्वनी उमटले नाहीत.

महाराणीने पुखंडेला एकांतात नेऊन वंदन केले आणि विचारले, “कलाकारां, तू खरी कोण आहेस? खरं काय ते सांग लपवून ठेऊ नकोस. तुला तुझ्या गुरूंची शपथ आहे.” गुरूंची शपथ घातल्याने आता प्रकट होण्याची हीच वेळ आहे असे समजून पुखंडा म्हणाली, “माताश्री महाराणी! मी नारी नाही. मी स्त्री वेषधारी गोरक्ष आहे. श्रीगुरू मच्छिंद्रनाथांचा शिष्य! गुरुभेटीसत्व आपल्या दरबारी आलोय हो माई!!” असे म्हणून गुरुपत्नीला वंदन केले. महाराणी म्हणाली, “गोरक्षनाथा, तू माझाही पुत्रच आहेस. महराजांनी अनंतवेळा तुझी आठवण काढून तुझे गुणगान केले आहे. तुझ्या भेटीसाठी त्यांचे आणि माझेही पंचप्राण तळमळत होते, परंतु आज दैवयोगाने भेट झाली.” त्याला पुरुषवेष करावयास लावला, राजवस्त्र परिधान करावयास लावले, त्यावर महाराणीने स्वहस्ते सुवर्णालंकार घातले. नवरत्नाचा मुकुट त्याच्या माथ्यावर ठेऊन त्यावर शिरपेच तुरा खोवला, ओझे होईल इतक्या सोन्याच्या दागिण्यांनी त्यास मढवले आणि हात धरून त्याला पुनश्च सभास्थानी घेऊन गेल्या. स्त्री राज्यात हा दुसरा पुरुष कोण, यांचा खुलासा करण्यासाठी महाराजांनी हाताने खूण केली, त्यावर महराणी म्हणाली, “आपल्या भेटीसाठी व्याकूळ होऊन गोरक्ष जती आला आहे. आज माझे भाग्य उजळले. माझा पुत्र भेटला, माझी सकळ चिंता दूर झाली. राजाला वारस मिळाला, आता गोरक्ष राज्य करील आणि मीननाथ त्याची सेवा करील. महाराज, आता आपल्या वृद्धापकाळाची चिंता दूर झाली. हे सारे मनोराज्य ऐकतांना गोरक्षनाथ स्मितहास्य करत मनात म्हणात होता, “या माई, सूर्याला अंधारात कोंडू पाहतायेत. आम्ही विरक्त शुद्ध वैष्णव, आम्हाला वैभव कशासाठी लागणार? विधवेला कुंकवाचा करंडा काय कामाचा? सोन्याने परीसाला सजवता

येत नाही किंवा ताक प्राशन जरून अमरत्व येत नाही. त्याचप्रमाणे आमच्यासारख्या तपस्व्यांना राजवैभव काय कामाचे? गाईच्या कासेमधल्या अल्पसल्प दुधाने क्षीरसागराची तहान भागेल काय? सकल पृथ्वीच्या राजपदी असणाऱ्याने ओंजळभर धान्याच्या मदतीची अपेक्षा करावी किंवा विश्वाला प्रकाश देणाऱ्या सूर्यनारायणाने काजव्याकडून तेज मिळाल्यास संतुष्ट व्हावे, त्याच न्यायाने आम्ही या जगताचे अनभिषिक्त सम्राट असल्याने, आम्हाला हे मर्त्य राजवैभव काय कामाचे? असो! आपला हेतू साध्य होईपर्यंत ऐकून घेऊ एकदा गुरुदेव आपल्या बाजूस आले की या वैभवावर लाथ मारून निघून जाऊ या."

महाराजांनी प्रमाने गोरक्षाला आलिंगन दिले. दोघांच्या नेत्रातून आनंदाश्रु वाहत होते. गोरक्षनाथांनी श्रीगुरुदेवांच्या चरणावर मस्तक ठेवून वंदन केले. महाराजांनी त्याला आपल्या शेजारी सिंहासनावर बसविले. संगीत मैफिल संपली होती. कालींगेला विपुल बिदागी देऊन सभा विसर्जित झाली. प्राणप्रिय गोरक्षनाथाच्या माथ्यावरून हात फिरवीत महाराजांनी योगक्षेम विचारले. तेव्हा त्याने बद्रीकाश्रमाच्या तपश्चर्येपासून ते आजच्या भेटीपर्यंतचा भूतकाळ कथन केला आणि म्हणाले, "गुरु महाराज! आता प्राण गेला तरी मी आपले चरण सोडणार नाही." महाराज त्याला दृढ आलिंगन देत म्हणाले, "होय! पुत्रा होय! मी सुद्धा तुला क्षणभरही सोडून राहणार नाही, तुला मी अंगाखांद्यावर खेळविला आहे, तुझे लालनपालन केले आहे, तुझी जननी आणि जनकही मीच आहे, माझ्याशिवाय तुला कोणी नाही. पाणी सोडून मत्स्य कुठे जात नाही, तसे तुला मी माझ्या प्रेमाच्या छायेतून बाहेर सोडला नव्हता पण प्रारब्ध योगाने मारुतीने मला येथे आणले, परंतु तुझ्या विरह वेदनेने, राजवैभव, पंचपक्वाने सुखाची वाटली नाहीत, मुखात घास घालताच विषासमान वाटायचे. तुझ्या आठवणीने आंतडे तुटत होते. तुला एकट्याला वनात सोडून आलो म्हणून अपराधी वाटत होते."

गोरक्षनाथ त्यांना बिलगत म्हणाला, "गुरुमाऊली तुम्ही अनेक देशात जाल, माझ्यासारखे अनेक शिष्य निर्माण कराल परंतु मला मात्र तुमच्याशिवाय कोण आहे? तुम्ही माझी एकच माऊली आहात, माझ्यासाठी आपणच जनक जननी आहेत." "होय रे होय, खरे आहे, माझ्याशिवाय तुला कोणी नाही."

महाराज गोरक्षाला एक क्षण ही एकटे राहू देत नव्हते; आसनी, वसनी, शयनी, भोजनी सतत त्याच्यासोबत असत. राजसभेत सिंहासनावर विराजमान असतांनाही एका मांडीवर गोरक्ष आणि दुसऱ्या मांडीवर मीननाथाला आणि शेजारी मैनाकिनीला बसवून राज्यकारभार करीत; त्यावेळी मच्छिंद्रनाथ; श्रीगणेश आणि कार्तिकेय यांना घेऊन बसलेल्या उमारमणांसमान शोभून दिसत असे.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने वेडाची बाधा नाहीशी होईल.